आदिवासी भागातील अंगणवाडी केंद्रांना
सोलर दिवे व पंखे पुरविण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांकः-मबावि-२०११/प्र.क्र.१४२/का-८
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३ ऑक्टोबर २०११.

वाचा :- १) आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.पुनर्वि-२०११/प्र.क्र.१७०/का-६, दिनांक ३१ मार्च २०११.
२) महिला व बाल विकास विभागाचा शासन निर्णय, क्र.एबावि-२०११/प्र.क्र.१०५/का-६, दिनांक ३१ मार्च २०११.
३) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र.मबावि/एबाविसेयो/का-२/९६०३/२०११, दि. ३१ मार्च २०११.

शासन निर्णय :- उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयानुसार आदिवासी क्षेत्रातील अंगणवाडी केंद्रांना सोलर दिवे व पंखे पुरविण्याकरिता पुनर्विनियोजनाव्दारे निधी उपलब्ध करुन देण्यात आला होता.तथापि, तांत्रिक कारणामुळे निधी उपलब्ध झाला नाही. तसेच संदर्भ क्र.२ अन्वये महिला व बाल विकास विभागाने सदर निधीच्या खर्चाला मान्यता दिली असून संदर्भ क्र.३ च्या पत्रांन्वये आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी अंगणवाडयांना सोलर दिवे व पंखे पुरविण्याचे आदेश दिलेले आहेत. यास्तव सन २०११-१२ या आर्थिक वर्षी सदरहू बाबीकरिता रु.५,७६,४८,४३७/- (अक्षरी रुपये पाच कोटी, शहात्तर लाख, अठ्ठेचाळीस हजार, चारशे सदतीस फक्त) एवढा निधी मंजूर करुन तो वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदरहू निधी महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत असून त्यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर बाबीसाठी मंजूर करण्यात आलेला निधी या विभागाची पूर्वमंजूरी घेतल्याशिवाय अन्य योजनेकरिता कळविता येणार नाही.

३. या बाबीवरील खर्च "मागणी क्र.टी-५- लेखाशिर्ष - २२३६ - पोषण आहार - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- ०२ - पोषण अन्न व पेये वितरण - ७९६ - जनजाती क्षेत्र उपयोजना - (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०१) महाराष्ट्र राज्य जिल्हापरिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हापरिषदांना अनुदाने - ३१ सहाय्यक अनुदान (२२३६०२९७) - ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या आर्थिक वर्षी उपलब्ध केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१११००३१४३१०००01 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अ. दि. सूर्यवंशी)
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति :-
मा.मंत्री (आदिवासी विकास),
मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास),
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई,
आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य,पुणे
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
कक्ष अधिकारी (का-६), आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई,
निवड नस्ती, का-८